कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांच्या वैधानिक लेखापरिक्षणासाठी नेमलेली अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. अस्थामु-२०१९/प्र.क्र.४०/१-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २३ सप्टेंबर, २०२१.

वाचा:-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.राजस-१००८/प्र.क्र.५३८/५-स, दिनांक ५/५/२०११
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.अस्थामु-२०१९/प्र.क्र.४०/१-स, दिनांक ०५/०४/२०२१.
३) वित्त विभाग शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र., दिनांक १०/०८/२०२१
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/कक्ष-१/कृषी प्रक्रिया संस्था/मुदतवाढ/१२१/२०२१, दि.०८/०२/२०२१.

**प्रस्तावना:-**

संदर्भिय वाचा क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या कृषी प्रक्रिया सहकारी संस्था या योजनेतील ३१ अस्थायी पदांना दिनांक ३१/०८/२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती. अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाने संदर्भिय वाचा क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दिलेले आहेत. त्यास अनुलक्षून सहकार आयुक्त व निबंधक,सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सदर योजनेतील ३१ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावास अनुलक्षून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

सदर शासन निर्णयाद्वारे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे त्यांच्या अधिनस्त असलेली कृषी प्रक्रिया सहकारी संस्थाच्या लेखापरिक्षणासाठीच्या ३१ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२१ ते दिनांक २८/०२/२०२२ पर्यंत खालील अटींच्या अधीनतेने मुदतवाढ देण्यास मंजुरी देण्यात येत आहे.

अ) सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असलेल्या अस्थायी पदांना ही मुदतवाढ लागू असणार नाही.

ब)अस्थायी पदे ज्या कारणास्तव मंजुर केली आहेत त्यांचे पालन करण्यात यावे.

क) वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या निर्देशाप्रमाणे सुधारीत आकृत्तीबंध अंतिम करून घेण्यानुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

ड) सुधारीत आकृत्तीबंधाची/पदांच्या आढाव्याची कार्यवाही मुदतीत पूर्ण न झाल्यास सदर अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्याचा प्रश्न निर्माण झाल्यास ती संबधीत कार्यालयाची जबाबदारी राहील.

इ) राष्ट्रीय सहकार विकास निगम योजनेअंतर्गत कृषि प्रक्रिया सहकारी संस्थाना देण्यात आलेल्या अर्थसहाय्याच्या वसुली अनुषंगाने प्राथम्याने कार्यवाही करण्यात यावी.

२. वरील प्रमाणे मुदतवाढ देण्यात आलेल्या पदांचा तपशिल सदर शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट- अ” प्रमाणे आहे.

३. सदर आदेश वित्त विभागाच्या संदर्भिय वाचा क्र.३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२१०९२३११३२४७६५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramdas Girjappa Kolekar

Digitally signed by Ramdas Girjappa Kolekar
DN: CN = Ramdas Girjappa Kolekar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Co-Operation Marketing & Textile Department
Date: 2021.09.23 11:33:46 +05'30'

**( रामदास कोळेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (सहकार व पणन) यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
४) महालेखापाल, (लेखापरिक्षक), मुंबई/ नागपूर
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
८) पणन संचालक,पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे
९) सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (प्रशासन/ लेखापरिक्षण)
१०) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
११) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, नाशिक, धुळे, सांगली बीड, नागपूर, भंडारा, पुणे,
१२) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२/वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई -३२
१३) अवर सचिव/कक्ष अधिकारी, (५स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई
१४) निवडनस्ती (१-स).

(शासन निर्णय क्र.अस्थामु-२०१९/प्र.क्र.४०/१-स, दिनांक:- २३ सप्टेंबर, २०२१ चे विवरणपत्र)

"परिशिष्ट-अ"

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे, यांचे अधिनस्त पदे

| अ. क्र. | पदनाम | जिल्हयाचे नाव | | | | | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | ठाणे | रायगड | नाशिक | धुळे | सांगली | बीड | नागपूर | भंडारा | |
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | १ | १ | ० | १ | ० | ० | १ | ० | ४ |
| २ | लेखापरिक्षक श्रेणी-१ | १ | ० | ० | ० | १ | १ | ० | ० | ३ |
| ३ | लेखापरिक्षक श्रेणी-२ | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | १ | २ |
| ४ | उपलेखापरिक्षक | १ | १ | ० | १ | ० | ० | १ | ० | ४ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | ३ | २ | १ | २ | १ | १ | १ | १ | १२ |
| ६ | शिपाई | २ | ० | १ | १ | ० | १ | ० | १ | ६ |
| | **एकूण पदे** | ८ | ४ | ३ | ५ | २ | ३ | ३ | ३ | ३१ |

Ramdas Girjappa Kolekar

Digitally signed by Ramdas Girjappa Kolekar
DN: CN = Ramdas Girjappa Kolekar, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Co-Operation Marketing & Textile Department
Date: 2021.09.23 11:34:03 +05'30'

( रामदास कोळेकर )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन